गुणवत्ता सुधार योजने अंतर्गत (क्यूआयपी)
पीएच.डी. अभ्यासक्रमासाठी अध्यापकांना
प्रतिनियुक्तीवर पाठविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक** :- प्रतिनि-२०१७/प्र.क्र.(१६२/१७)/तांशि -१
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०४ जुलै, २०१७.

वाचा :-

१) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्रमांक प्रतिनि-२०९५/१९५५७/(१९५/९५)/तांशि-४, दिनांक २०/११/१९९६.
२) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्रमांक प्रतिनि-२०९५/१९५५७/(१९५/९५)/तांशि-४, दिनांक २८/१०/१९९८.
३) तंत्रशिक्षण संचालनालयाची क्र. ४/आस्था/२०१७/पी.एच.डी. /२७४, व क्र. ४/आस्था/२०१७/ पी.एच.डी./२७६, दि. २६/०५/२०१७ रोजीची पत्रे.

**शासन निर्णय :-**

सन २०१७-१८ पासून ०३ वर्षाकरीता पीएच. डी. अभ्यासक्रमासाठी खालील विवरणपत्रात दर्शविण्यात आलेल्या सहा अध्यापकांची दि. २०/११/१९९६ तसेच दि. २८/१०/१९९८ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार गुणवत्ता सुधार योजने अंतर्गत पीएच. डी. अभ्यासक्रम पूर्ण करण्याकरीता निवड झालेली आहे.

| अ.क्र. | अध्यापकाचे नांव व पदनाम | कार्यरत संस्थेचे नांव | पीएच.डी साठी निवड झालेल्या संस्थेचे नांव |
|---|---|---|---|
| १. | श्री. आशिष रा. आखरे, सहाय्यक प्राध्यापक, उपयोजित यंत्रशास्त्र | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, अमरावती | इंडियन इन्स्टिटयूट ऑफ टेक्नोलॉजी , मुंबई |
| २. | श्री. भूषण सु. येलुरे, सहाय्यक प्राध्यापक, माहिती तंत्रज्ञान | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, कराड | वालचंद अभियांत्रिकी महाविद्यालय, सांगली |
| ३. | श्रीमती शर्वरी नि. ढेपे, सहाय्यक प्राध्यापक, उपयोजित यंत्रशास्त्र | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, जळगांव | व्ही. जे. टी. आय., मुंबई |
| ४. | श्री. प्रफुल्ल कृ. देशपांडे, सहाय्यक प्राध्यापक, उपयोजित यंत्रशास्त्र | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, कराड | व्ही. जे. टी. आय., मुंबई |
| ५. | श्रीमती संगिता बा. नेमाडे, सहाय्यक प्राध्यापक, माहिती तंत्रज्ञान | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, औरंगाबाद | वालचंद अभियांत्रिकी महाविद्यालय, सांगली |
| ६. | श्री. सचिन राजाराम वनकर, सहाय्यक प्राध्यापक, यंत्र अभियांत्रिकी | सरदार पटेल अभियांत्रिकी महाविद्यालय, अंधेरी, मुंबई | भारतीय औद्योगिकी संस्थान, मुंबई |

२. शासन निर्णय क्रमांक प्रतिनि-२०९५/१९५५७/(१९५/९५)/तांशि-४, दि. २०/११/१९९६ व दि. २८/१०/१९९८ या शासन निर्णयानुसार विहीत करण्यात आलेल्या पुढील नमूद अटीं व शर्तींच्या अधिन राहून संबंधित अध्यापकांना प्रतिनियुक्तीवर पाठविण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

१) प्रतिनियुक्ती पूर्ण निर्धारित कालावधीकरिता असेल.
२) प्रतिनियुक्तीच्या कालावधीत संबंधित अध्यापकांच्या जागेवर दुस-या व्यक्तीची नियुक्ती करण्यास मान्यता असेल.
३) उपरोक्त अध्यापकांना खालील अट क्र. ८ चे अधिन राहून त्यांच्या प्रतिनियुक्तीच्या कालखंडात नियमानुसार अनुज्ञेय असलेले वेतन व भत्ते देय राहतील.
४) संबंधीत अध्यापकांना त्यांच्या वेतनाव्यतिरिक्त ते ज्या संस्थेत प्रतिनियुक्तीवर पाठविण्यात आले त्या संस्थेने त्यांना विद्यावेतन शिष्यवृत्ती दिल्यास ती स्विकारण्यास त्यांना परवानगी देण्यात येत आहे.
५) प्रतिनियुक्तीच्या ठिकाणी जाण्यासाठी किंवा प्रतिनियुक्तीच्या कालावधीत तसेच प्रतिनियुक्ती संपल्यावर मुख्यालयात परत येण्यासाठी त्यांना प्रवासभत्ता वा दैनिक भत्ता अनुज्ञेय राहणार नाही.
६) संबंधीत अध्यापकांना त्यांच्या उर्वरित सेवा कालावधीत कधीही अध्यापन रजा घेता येणार नाही व तसे बंधपत्र प्रशिक्षणासाठी जाण्यापूर्वी त्यांना त्यांच्या कार्यालयाकडे द्यावे लागेल.
७) संबंधित अभ्यासक्रमासाठी करारनिर्दिष्ट काळापेक्षा जास्त कालावधी वाढवून मिळण्यास त्यांनी अर्ज केल्यास प्रतिनियुक्तीच्या वाढलेल्या कालावधीसाठी त्यांची देय व अनुज्ञेय रजा समजण्यात येईल.
८) प्रशिक्षण पूर्ण झाल्यानंतर कार्यरत संस्थेची सलग ०६ वर्षे सेवा करण्याचे बंधपत्र त्यांना प्रशिक्षणासाठी जाण्यापूर्वी द्यावे लागेल. हे बंधपत्र त्यांना शासन पत्र सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही १०६८/डी-१०, दि. १५/१०/१९९८ सह शासन ज्ञापन सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-१०६९, दिनांक २१/०६/१९७९ मध्ये विहीत केल्याप्रमाणे द्यावे लागेल.
९) संबंधीत अध्यापक, हे जर त्यांचे प्रशिक्षण अर्धवट सोडून येतील किंवा बंधपत्राप्रमाणे संस्थेत सेवा करणार नाहीत, तर त्यांच्याकडून शासनाने त्यांच्यावर केलेला संपूर्ण खर्च प्रचलित व्याजासह वसूल करण्यांत येईल.
१०) प्रतिनियुक्तीचा कालावधी सेवा काळ म्हणून समजण्यात यावा.
११) सदर प्रशिक्षणासाठीची प्रतिनियुक्ती त्यांच्यापेक्षा ज्येष्ठ असलेल्या कर्मचा-यांच्या अगोदर पदोन्नतीसाठी आधारभूत ठरु शकणार नाही.

३. उपरोक्त नमूद क्र. ६ व ८ बाबींवरील बंधपत्रे संबंधित अध्यापकास प्रतिनियुक्तीसाठी कार्यमुक्त करण्यापूर्वी घेण्याची संबंधितांनी दक्षता घ्यावी. तसेच संबंधित अध्यापकांना सदर संस्थेतून कार्यमुक्त केल्याच्या दिनांकापासून त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी सुरु होईल.

४. असे प्रमाणित करण्यांत येते की, संबंधित अध्यापकांना गुणवत्ता दर्जा सुधार कार्यक्रमानुसार पीएच. डी. अभ्यासक्रमासाठी पाठविण्यात आले नसते तर, वरील अभ्यासक्रमाच्या काळात त्याच पदावर ते स्थानापन्न राहीले असते.

५. सदर आदेश शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. प्रतिनि-२०९५/१९५५७/(१९५/९५)/तांशि-४, दिनांक २०/११/१९९६ व दि. २८/१०/१९९८ मधील अटी व शर्ती तसेच तरतूदीनुसार शासनाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०७०४१८१५४३६१०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sudhir Jaya Shetty

Digitally signed by Sudhir Jaya Shetty
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, serialNumber=e9d37d499a521b728aeb3dc8ec38b759420308b9fd7816002b4af0ffbf1111d7, cn=Sudhir Jaya Shetty
Date: 2017.07.04 18:14:57 +05'30'

**( सुधीर जया शेट्टी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति:**

सर्व संबंधित अध्यापक, (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)

**प्रत:-**

१) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) मा. अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक यांना माहितीस्तव.
३) सह संचालक, विभागीय कार्यालय, मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)
४) प्राचार्य , शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, अमरावती/कराड/जळगाव/औरंगाबाद (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)
५) प्राचार्य, सरदार पटेल अभियांत्रिकी महाविद्यालय, अंधेरी (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२ मुंबई/नागपूर.
७) जिल्हा कोषागार आधिकारी, अमरावती/सातारा/जळगाव /औरंगाबाद.
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९) निवड नस्ती-तांशि-१